**संवर्धन राखीव क्षेत्रातील काही भागास अभयारण्य घोषित करण्याची शक्यता पडताळून पाहण्यासाठी उपसिमिती गठीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-०७२१/प्र.क्र. १५९/फ-१**
मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२
दिनांक:- ०१ फेब्रुवारी, २०२२

वाचा :-

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०१२२/प्र.क्र. ०९/फ-१ दि.०५ ऑगस्ट, २०२१.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२३ (२) / वजी/सर्व्हे/प्र.क्र.२३ (२०२१)/२५५४/२०२०-२१, दिनांक ०५.०१.२०२२.

प्रस्तावना :-

राज्य वन्यजीव मंडळाच्या दि. ०४.१२.२०२० रोजी संपन्न झालेल्या १६ व्या बैठकीमध्ये राज्यातील संवर्धन राखीव क्षेत्रातील काही भागास अभयारण्य घोषित करण्याची शक्यता पडताळून पाहण्यासाठी मंडळाची उपसमिती गठीत करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मंडळाच्या ३ उपसमित्या गठीत करण्यात आल्या आहेत. त्याचबरोबर महेंद्री संवर्धन राखीव क्षेत्रास अभयारण्य घोषित करण्याची शक्यता पडताळून पाहण्यासाठी मंडळाच्या निर्णयानुसार एक उपसमिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महेंद्री संवर्धन राखीव क्षेत्रास अभयारण्य घोषित करण्याची शक्यता पडताळून पाहण्यासाठी राज्य वन्यजीव मंडळाच्या अशासकीय सदस्यांचा तसेच त्या क्षेत्रातील अधिकाऱ्यांचा समावेश करुन उपसमिती गठीत करण्याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**उपसमिती क्र. ४ :-**

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती | अध्यक्ष |
| २ | श्री. किशोर रिठे, सदस्य राज्य वन्यजीव मंडळ | सदस्य |
| ३ | श्री. यादव तरटे पाटील, सदस्य राज्य वन्यजीव मंडळ | सदस्य |
| ४ | उप वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती | सदस्य सचिव |

२. वरीलप्रमाणे गठित उपसमितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील -:

अ) वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ मधील तरतूदीनुसार वन्यजीवांच्या संरक्षण आणि संवर्धनाच्या दृष्टीने अभयारण्य म्हणून घोषित करण्यासाठी योग्यता ठरविणे.

आ) प्रस्तावित करण्यात येणाऱ्या क्षेत्रावरील असलेले स्थानिक लोकांचे हक्क व सवलती यांचा अभ्यास करणे.

इ) प्रस्तावित क्षेत्रातील स्थानिक लोकांशी सल्लामसलत करणे.

ई) अभयारण्य म्हणून घोषित केल्यामुळे त्याचा स्थानिकांचे गुरेचराई, बांबू, जळाऊ लाकूड, गौण वनोपज गोळा करणे व त्यांच्या उपजिविकेच्या संधी कमी होणे तसेच वानिकीवरील अवलंबन कमी झाल्यास पर्यायी उपजिविकेची साधने याचे मूल्यमापन करणे ईत्यादि बाबींचे अनुषंगाने असलेल्या वन अवलंबित्वावर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास करणे.

उ) अभयारण्य क्षेत्रामध्ये रुपांतरण करावयाचे झाल्यास स्थानिक लोकांचे सदर क्षेत्रावरील अवलंबत्व कमी करण्यासाठी उपाययोजना सूचविणे.

ऊ) प्रस्तावित अभयारण्यात कोणती गावे समाविष्ट करणे आवश्यक आहेत व त्यांचे पुनर्वसन करावयाचे झाल्यास प्रचलित धोरणानुसार लागणारी जमिन / रक्कम याचा अभ्यास करणे.

३. उक्त उपसमितीने संबंधित गावकरी यांचेशी प्राथमिक स्वरुपात चर्चा करावी व त्यांचे मत / विचार जाणुन घ्यावे. तसेच क्षेत्रीय स्तरावर आवश्यक असल्यास भेटी देऊन व त्या क्षेत्रातील तज्ज्ञांशी चर्चा करावी, याबाबतीत उपलब्ध साहित्याचा अभ्यास करुन आपला अहवाल तयार करावा.

४. सदर उपसमितीने आपला अहवाल शासन निर्णयाच्या दिनांकापासून २ महिन्याच्या कालावधीत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर करावा.

५. सदर अभ्यासगटा मधील अशासकीय सदस्य यांना रुपये ८९००/- व त्याहून अधिक ग्रेड वेतन असणा-या शासकीय कर्मचा-यांच्या दराने प्रवासभता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. मात्र त्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकुलीत प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०११२५२१४५०१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.02.01 12:53:28 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी,**
**महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (पर्यावरण, पर्यटन व राजशिष्टाचार) यांचे खजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुर्व,नागपूर
९. सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)
१०. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
११.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर
१२.वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर
१३.वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
१४.वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व बोर व्याघ्र प्रकल्प, गोंदिया
१५.वनसंरक्षक व  संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली
१६.सर्व उपवनसंरक्षक (प्रादेशिक)
१७. राज्य वन्यजीव मंडळाचे सर्व सदस्य
१८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई /निवड नस्ती.

*****